महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणा-या कारागृह कर्मचा-यांच्या प्रवास खर्चापोटी सन १९९२-९३ व १९९३-९४ या वर्षात अदा करावयाची रक्कम.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग, मंत्रालय,
मुंबई -४०० ०३२.

शासन निर्णय क्र. एमआयएस-१०९२/२८[१२५]/पीआरएस-२,

दिनांक : 10 ऑगस्ट, १९९३.

वाचा :- १] शासन निर्णय, गृह विभाग, क्र. एमआयएस-१०९२/२८[१२५]/पीआरएस-२, दिनांक २७.८.१९९२.

२] उप महा व्यवस्थापक [वाहतूक], महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. रापम/वाह/पीएमडब्ल्यु/२०५/३८५९, दि. १५.६.१९९३.

निर्णय :- महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास त्यांच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणा-या कारागृह कर्मचा-यांच्या प्रवास खर्चापोटी द्यावयाच्या रकमेबाबत दिनांक ३.४.१९८७ च्या बैठकीत ठरल्यानुसार सन १९९२-९३ या वर्षासाठी रु. २१,२३,५३०/- एवढी ढोबळ रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास तात्पुरती अदा करण्यात आलेली आहे. पोलीस विभागाने सन १९९२-९३ या वर्षात वापरलेल्या पोलीस मोटार वारंटसची महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या औरंगाबाद व बुलढाणा या दोन विभागाची व्रच चाचणी पाहणी केली असून ती बरोबर असल्याचे आढळून आले आहे. त्यानुसार १९९२-९३ या वर्षात प्रत्यक्ष खर्च झालेली रक्कम व तात्पुरती दिलेली रक्कम यातील फरक तसेच १९९२-९३ मध्ये झालेल्या प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे १९९३-९४ साठी, द्यावयाची तात्पुरती ढोबळ रक्कम अदा करावी, अशी विनंती महामंडळाने केली आहे. त्यानुसार सन १९९२-९३ या वर्षात दिलेली तात्पुरती रक्कम व प्रत्यक्ष खर्च झालेली रक्कम यातील फरक रु. १,३४,५२४/- [रुपये एक लाख, चौतीस हजार, पाचशे चोवीस फक्त] व सन १९९३-९४ या वर्षासाठी द्यावयाची तात्पुरती ढोबळ रक्कम रु. २२,५८,०५४/- [रुपये बावीस लाख, अठ्ठावन्न हजार, चौपन्न फक्त] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मंजूरी देत आहे. ही रक्कम दिनांक ३१.८.१९९३ पूर्वी महाराष्ट्र राज्यमार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च "२०५६ तुरुंग–००१–संचालनालय व प्रशासन–००१ [एक] कारागृह निरीक्षणालय–२० इतर खर्च दत्तमत " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो चालू वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर–४२५/९३/व्यय–८, दि. २२.७.१९९३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ अ. ल. पाटील ]

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

महालेखापाल, महाराष्ट्र–१ व २ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई / नागपूर,

महालेखापाल, महाराष्ट्र–१ व २ [लेखा परीक्षा], मुंबई / नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

उप महाव्यवस्थापक [वाहतूक], महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,

वित्त विभाग, व्यय–८,

गृह विभाग, बीयुडी–१, पोल–३ब.